नगरपाल (शेरिफ) कार्यालय, मुंबई यांच्या आस्थापनेवरील ३०अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत

# महाराष्ट्र शासन

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: शेरिफ १६२३/प्र.क्र.२५/का.९**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

दिनांक :- १० मार्च,२०२५.

**पहा :** १) शासन निर्णय क्रमांक: शेरिफ १६१८/प्र.क्र.२५/का-नऊ, दि.१०.०९.२०२४.
२) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. शेरिफ १६१६/प्र.क्र.१२६/का-९, दि.७.०१.२०२०.
३) नगरपाल कार्यालय यांचे पत्र क्र. २५८/२०२५, दि. ०४.०३.२०२५
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५.

**प्रस्तावना :**

नगरपाल (शेरिफ) कार्यालय, मुंबई यांच्या आस्थापनेवरील ३० अस्थायी पदांना संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयानुसार दि.०१.०९.२०२४ ते दि.२८.०२.२०२५ या कालावधीपर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. सदर मुदतवाढ आता संपुष्टात आलेली आहे. संदर्भ क्र.३ अन्वये नगरपाल कार्यालयाने सुधारीत आकृतीबंधानुसार ३०अस्थायी पदांना पुढील कालावधीसाठी मुदतवाढ देण्याबाबत शासनास विनंती केली आहे. संदर्भ क्र.४येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेले आहेत. त्यानुसार नगरपाल (शेरिफ) कार्यालयातील ३० अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ ते दि. ३१.०८.२०२५ या कालावधीकरीता मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

नगरपाल (शेरिफ) कार्यालयाच्या आस्थापनेवरील सोबतच्या परिशिष्ट 'अ' येथे दर्शविलेली ३० अस्थायी पदे दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ या कालावधीत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजुरी देण्यात येत आहे.

२. या प्रकरणी येणारा खर्च "मागणी क्र. जे-१, २०१४, न्यायदान-११३-१ शेरीफ (भारित), २०१४ ०२७२, ०१-वेतन या लेखाशिर्षाखाली" खर्ची टाकण्यात यावा व तो त्या लेखाशिर्षाखाली संबंधित वित्तीय वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५ द्वारे प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३१०१७३६४८७८१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHILPA DILIP GAIKWAD

Digitally signed by SHILPA DILIP GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Law and Judiciary Department, 2.5.4.20=087014bd7de0d3d28bc50a76e6183c9a63857b3391f4b1f66149b3ed7bf84ef2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=e366bed26d5b71bce1df85a689815924b8cc3d6a61e23fdc7aecad83968ce1f3, cn=SHILPA DILIP GAIKWAD
Date: 2025.03.10 17:37:51 +05'30'

**( शि.दि. गायकवाड )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
२) महालेखापाल-एक (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
३) नगरपाल (शेरिफ) कार्यालय, मुंबई,
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
५) निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
६) वित्त विभाग/व्यय-५
७) विधी व न्याय विभाग कार्यासन-२३, २४, २५,
८) निवडनस्ती-का.९

शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्रमांक शेरिफ १६२३/प्र.क्र.२५/का. नऊ
दिनांक :- १० मार्च,२०२५ सोबतचे परिशिष्ट 'अ'
अस्थायी पदे :- नगरपाल (शेरिफ) कार्यालय, मुंबई

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | पदे निर्माण करण्यात आलेल्या शासन निर्णयाचा क्रमांक व दिनांक |
|---|---|---|---|
| १ | कक्ष अधिकारी | १ | क्र.एसएचई-१००१/प्र.क्र.१०६/नऊ, दि.२५.०१.२००३ |
| २ | लघुलेखक व सचिव | १ | क्र.एसएचई-१०७६/१२४/१८, दि.०८.०३.१९७६ |
| ३ | बेलिफ व लिपिक | ५ | क्र.एसएचई-१००१/प्र.क्र.१०६/नऊ, दि.२५.०१.२००३ |
| ४ | बेलिफ व लिपिक | २ | क्र.एसएचई-१००१/प्र.क्र.१०६/नऊ, दि.२५.०१.२००३अन्वये पुनर्जिवित |
| ५ | बेलिफ व लिपिक | ३ | क्र.ईएसटी-१००६/(१६७) नऊ, दि.२१.०९.२००६ |
| ६ | लेखापाल | १ | क्र.एसएचई-१००९/प्र.क्र.९५/का.नऊ, दि.२७.०६.२०१३ |
| ७ | रोखपाल व बुककिपर | १ | क्र.एसएचई-१००९/प्र.क्र.९५/का.नऊ, दि.२७.०६.२०१३ |
| ८ | बेलिफ व लिपिक | १६ | क्र.एसएचई-१००९/प्र.क्र.९५/का.नऊ, दि.२७.०६.२०१३ |
| **एकूण पदे - ३० (तीस)** | | | |